**माहिती तंत्रज्ञान तज्ञ ही पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतून वगळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विविआ-२०१९/प्र.क्र.५१३/प्रशा-१**
तिसरा मजला, विस्तार इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ मार्च, २०२३

**संदर्भ-** १) शासन निर्णय क्र: पदनि-२०२०/प्र.क्र.३३७/प्रशासन-१,दिनांक-०६.११.२०२०
२) शासन निर्णय क्र: विविआ-२०२०/प्र.क्र.३१६/प्रशासन-१, दिनांक-२६.११.२०२०
३) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.एनसीआर-४६१५/प्र.क्र.१०/२०२०/जाहिरात, दिनांक-०७.०३.२०२२.

**प्रस्तावना -**

भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद १६६ द्वारा तयार केलेल्या महाराष्ट्र शासन कार्यनियमावली अन्वये देण्यात आलेल्या शासकीय कामकाजासंबंधी दिलेल्या अनुदेशानुसार राज्याचा अर्थसंकल्प तयार करून तो विधानमंडळास सादर करण्याची जबाबदारी वित्त विभागास सोपविण्यात आलेली आहे. अर्थसंकल्प सादर करताना वार्षिक वित्तीय विवरणपत्रासह अर्थसंकल्पीय प्रकाशने सादर केली जातात. सदर प्रकाशने तयार करताना याबाबतची अचूक आकडेवारी मागणीनिहाय/ लेखाशिर्षनिहाय/ तपशिलवार उद्दिष्टासह वित्त विभागाच्या संगणक प्रणालीवर भरण्यात येते. अर्थसंकल्प संगणक प्रणालीमार्फत प्रत्यक्ष रकमा भरणे ते वार्षिक वित्तीय विवरणपत्र व संक्षिप्त अर्थसंकल्प अंतिम करणे असे पूर्ण चक्र होण्यासाठी विविध संगणकीय आज्ञावलींची आवश्यकता असते. सबब सदर कामे करण्यासाठी वित्त विभागाच्या संगणक कक्षाचे बळकटीकरण करण्यासाठी संगणक कक्षासाठी आवश्यक असणारी ३ नविन पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतून वगळून विभागाच्या दिनांक २६.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या तांत्रिक समितीमार्फत भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने सदर प्रस्ताव मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यास दिनांक २०.१०.२०२२ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

वित्त विभागातील संगणक कक्षाचे बळकटीकरण करण्यासाठी संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णय दिनांक ०६.११.२०२० नुसार निर्माण करण्यात आलेली माहिती तंत्रज्ञान तज्ञ (प्रशासक आज्ञावली तज्ञ) गट-अ, माहिती तंत्रज्ञान तज्ञ (आज्ञावली तज्ञ) गट-अ व माहिती तंत्रज्ञान तज्ञ (सहायक आज्ञावली तज्ञ) गट-ब ही ३ पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतून वगळून दिनांक २६.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या तांत्रिक समितीमार्फत भरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११११५७१६८७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=476d37b83707d4fa8d081fe85145aa8df78154c98a1889573cd2900918d397e5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A256E2285AACFD4CDF1A5A468970133F213ECC0C01D84AA031BA50479F2EEF89, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2023.03.02 15:03:25 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
सह सचिव (प्रशासन)
वित्त विभाग

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. मंत्री (वित्त विभाग) यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री (वि.वि.) यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (सामान्य प्रशासन विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
९. महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई
१०.विभागातील सर्व सह सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी
११.निवड नस्ती (प्रशासन-१).

*****